**मा. सर्वोच्च न्यायालय यांच्या आदेशानुसार बाधीत होणाऱ्या अनुज्ञप्तीच्या स्थलांतरणाबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन परिपत्रक क्र. बीपीए०४१७/प्र.क्र.७१(भाग-१)/राउशु-२,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ०७ जून, २०१७.

**वाचा-** १) शासन परिपत्रक क्र. एफएलआर १३०२/सीआर-५७/इएक्ससी-२, दि.०१/०२/२००५.
२) मा. सर्वोच्च न्यायालय, नवी दिल्ली यांच्या सिव्हील अपिल क्र. १२१६४-१२६६६/२०१६ व त्याअंतर्गत पुनर्विचार याचिका क्र. ६६८८/२०१७ व इतर मधील आदेश.

**परिपत्रक**

मा. सर्वोच्च न्यायालय, नवी दिल्ली यांच्या सिव्हील अपिल क्र. १२१६४-१२६६६/२०१६ व त्याअंतर्गत पुनर्विचार याचिका क्र. ६६८८/२०१७ व इतर मधील दि.१५ डिसेंबर, २०१६ व दि. ३१ मार्च, २०१७ रोजी पारीत केलेल्या आदेशानुसार राष्ट्रीय महामार्ग / राज्य मार्गापासून ५०० मीटर तर सुमारे वीस हजार पेक्षा कमी लोकसंख्या असलेल्या क्षेत्रातील २२० मीटर अंतरातील मद्य विक्री अनुज्ञप्त्या दि.०१ एप्रिल, २०१७ पासून बंद करण्याबाबत व नवीन मद्यविक्री अनुज्ञप्त्या मंजुर न करण्याबाबत आदेशीत केले आहे. त्यानुसार सदर आदेशाची दि.०१/०४/२०१७ पासून तात्काळ अंमलबजावणी करण्यात आली आहे. मा. सर्वोच्च न्यायालयाने दिलेल्या आदेशाच्या अनुषंगाने किरकोळ मद्य विक्री अनुज्ञप्त्यांचे मंजूर व स्थलांतराचे नवीन निकष व नियम शासन अधिसूचना क्र. बीपीए०४१७/ प्र.क्र.७१/ राउशु-२ दि. ०६ जून, २०१७ अन्वये नियमांमध्ये सुधारणा करण्यात आलेल्या आहेत. त्यानुसार अनुज्ञप्ती मंजुरी/स्थलांतरण करण्याबाबत खालीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहेत.

१. शासन परिपत्रक क्र. एफएलआर १३०२/सीआर-५७/इएक्ससी-२, दि.०१ फेब्रुवारी, २००५ च्या परिशिष्ट अन्वये दिलेल्या सूचनेमधील मधील अनुक्रमांक १० येथील सूचना रद्द करण्यात येत असून, राष्ट्रीय महामार्ग / राज्य मार्गाच्या कडेपासून किंवा सर्व्हिस रोड असल्यास त्यांच्या कडेपासून ५०० मीटर व सुमारे वीस हजार पेक्षा कमी लोकसंख्या असलेलया क्षेत्रातील २२० मीटरच्या आत वरीलपैकी कोणतीही मद्य विक्री अनुज्ञप्ती मंजूर / स्थलांतरीत करण्यावर निर्बंध घालण्यात आले असल्याने या निर्बंधक्षेत्रात कोणतीही किरकोळ मद्यविक्री अनुज्ञप्ती कार्यरत राहणार नाही यांची दक्षता घ्यावी.

२. शासन परिपत्रक क्र. एफएलआर १३०२/सीआर-५७/इएक्ससी-२, दि.०१ फेब्रुवारी, २००५ चे परिशिष्ट अन्वये दिलेल्या सूचनेमधील मधील अनुक्रमांक ११ बाबत असे सूचित करण्यात येते की, मा. सर्वोच्च न्यायालयाच्या आदेशान्वये बाधीत झालेल्या अनुज्ञप्तीचे स्थलांतरण करतांना प्रस्तावित क्षेत्रात किरकोळ मद्यविक्री अनुज्ञप्ती कार्यरत असल्यास पोलीस विभागाचा कायदा व सुव्यवस्थेबाबतचा अहवाल मागविण्यात येऊ नये. तसेच एफएल-२ अनुज्ञप्ती मधून सील बंद बाटलीमधून मद्यविक्री होत असल्याने सदर अनुज्ञप्तीच्या स्थलांतरणासाठी पोलीस अहवालाची आवश्यकता नाही, असे स्पष्ट करण्यात येत आहे.

३. मा. सर्वोच्च न्यायालयाच्या दि.१५/१२/२०१६ व दि.३१/०३/२०१७ रोजीचे आदेश प्राप्त होण्यापूर्वी सन २०१७-१८ किंवा एक वर्षापेक्षा जास्त म्हणजेच पाच वर्षाकरीता नुतनीकरण करण्यात आलेल्या अनुज्ञप्त्यांपैकी मा. न्यायालयाच्या आदेशाने बाधीत होणाऱ्या अनुज्ञप्तींचे स्थलांतरण शक्य

होत नसल्यास आणि अनुज्ञप्तीधारकांकडून नुतणीकरण रक्कमेच्या परताव्याबाबत अर्ज प्राप्त झाल्यास, महाराष्ट्र पेय मद्य (अनुज्ञप्तीचे नुतनीकरण) नियम १९९६ आणि महाराष्ट्र कोषागार नियमांमधील तरतुदीनुसार जिल्हाधिकारी यांनी वापर करुन योग्य ती कार्यवाही करण्यात यावी.

४. मा. सर्वोच्च न्यायालयाच्या आदेशाने बाधीत होणाऱ्या अनुज्ञप्तींचे स्थलांतर करतांना मुंबई दारुबंदी (विशेषाधिकार शुल्क) नियम १९५४ च्या नियम ४ च्या उपनियम (ड) मधील खंड (III) च्या तरतूदीनुसार मा. न्यायालयाच्या आदेशानुसार अनुज्ञप्तींचे स्थलांतरण होत असल्यास विशेषाधिकार शुल्क आकारण्यात येवू नये, अशी तरतूद आहे. त्याप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी.

५. अनुज्ञप्ती स्थलांतरणास सक्षम प्राधिकारणाने परवानगी दिल्यानंतर अनुज्ञप्ती ज्या ठिकाणी स्थलांतरीत होणार आहे त्या भागातील लोकसंख्येनुसार नुतनीकरण शुल्क आकारण्यात यावे व तद्नंतर अनुज्ञप्ती चालू करण्यास परवानगी देण्यात यावी.

६. मा. न्यायालयाच्या आदेशान्वये सीएल-३ अनुज्ञप्तीचे स्थलांतर होत असल्यास महाराष्ट्र देशी मद्य नियम १९७३ मधील नियम २५ मधील उप-नियम (डी) मधील दुसऱ्या परंतुकानुसार तर एफएल-२ अनुज्ञप्तीबाबत महाराष्ट्र विदेशी मद्य नियम १९५३ मधील नियम २४ उप-नियम (४) मधील खंड (डी) च्या दुसऱ्या परंतुकानुसार त्याच जिल्ह्यात स्थलांतरण होत असल्यास स्थानिक स्वराज्य संस्थेच्या ना-हरकत प्रमाणपत्राची आवश्यकता नसल्याची तरतूद आहे, ही बाब निदर्शनास आणण्यात येत आहे.

७. अशा बाधीत होणाऱ्या अनुज्ञप्त्यांचे स्थलांतरणास मान्यता देताना कार्यवाही तातडीने करावी तसेच नियमांच्या तरतूदींव्यतिरिक्त इतर कागदपत्रे (उदा. जागा अकृषीक परवाना) अनुषंगीक परवानग्या एक वर्षाच्या आत संबंधीत अधीक्षक कार्यालयात सादर करण्याच्या अटीच्या अधीन राहून अनुज्ञप्तींचे स्थलांतरण करुन देण्याची कार्यवाही करण्यात यावी.

८. मा. सर्वोच्च न्यायालयाच्या निर्णयाने बाधीत होणाऱ्या अनुज्ञप्त्यांचे स्थलांतरण करतांना मुंबई दारुबंदी (विशेषाधिकार शुल्क ) नियम, १९५४ च्या नियम-४ (ड) (III) मधील तरतूदीनुसार स्थलांतरण शुल्क आकारु नये.

९. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१७०६०७१३४७५१८४२९ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने सक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

Punam Hiraman Wagde

Digitally signed by Punam Hiraman Wagde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=26d7295f0f289d96eecb9e12c2850ebd4f894edc0ea69760a3c1561515a6bf87, cn=Punam Hiraman Wagde
Date: 2017.06.07 13:46:03 +05'30'

( पु. हि. वागदे )
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) सर्व जिल्हाधिकारी.
३) सर्व अधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क.
४) कार्यासन अधिकारी (राउशु-३), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
५) निवडनस्ती राउशु-२.